गांग्रई व केतकी, ता.चिपळूण, जि.रत्नागिरी
येथील जेट्टीची लांबी व उंची वाढविणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

शासन निर्णय क्र.पीएलएन-०५०४/प्र.क्र.६९/बंदरे-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक : १२ सप्टेंबर, २००४

वाचा : १) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे पत्र क्र.ममेबो/अर्थ-२/पावसाळी अधिवेशन/३०५१/१२२०, दि.२१ एप्रिल, २००४

२) शासनपत्र, गृह विभाग, क्र.एसयुपी-११०३/पु.मा./जून, २००४/बीयुडी-१, दि.२ जुलै, २००४

**शासन निर्णय** :- गांग्रई, केतकी, ता.चिपळूण, जि.रत्नागिरी येथील जेट्टीचा वापर प्रवाशांना सुलभतेने करता यावा याकरिता गांग्रई व केतकी येथील जेट्टीची लांबी व उंची वाढविणे व प्रवाशांच्या सोईसाठी प्रवाशी शेडची सुधारणा करणे आवश्यक आहे. उपरोक्त दोन्ही कामे नवीन असून सदर कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. दोन्ही कामांचा अपेक्षित खर्च रु.३२,२३,४९४/- आहे. सदर प्रस्तावित दोन्ही कामांना सुरुवात करणेसाठी मुख्य लेखाशिर्ष "पूरक मागणी क्र.बी-७, ३०५१ - बंदरे व दिपगृहे (योजनांतर्गत), ०२ लहान बंदरे १९० सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना सहाय्य (दोन) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान (लहान बंदरे विकास) (योजनांतर्गत) (३०५१०७०३)" या लेखाशिर्षाखाली रु.१०,०००/- (रुपये दहा हजार) एवढया रक्कमेचा लाक्षणिक निधी (Initial Amount) खर्च करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांना या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२. हा खर्च "पूरक मागणी क्र.बी-७, ३०५१ - बंदरे व दिपगृहे (योजनांतर्गत), ०२ लहान बंदरे १९० सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना सहाय्य (दोन) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान (लहान बंदरे विकास) (योजनांतर्गत) (३०५१०७०३)" या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय, गृह विभाग क्र.इपीटी-१०९६/प्र.क्र.१३३/परि-५, दि.२२ नोव्हेंबर, १९९६ अन्वये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची स्थापना झाल्यामुळे योजनांतर्गत व योजनेतर कामे बोर्डामार्फत करण्यात येतात. याकरिता शासनाकडून बोर्डाला अनुदान, अर्थसंकल्प, कर्जे वगैरे देण्याची तरतूद महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम, १९९६ च्या कलम ७३ मध्ये आहे.

४. वरील तरतुदीकरिता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे राहतील व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे नियंत्रक अधिकारी राहतील व महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे वर्ग केलेली रक्कम अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांचेकडे संबंधित लेखाशिर्षाखाली रकमेची मागणी करतील.

५. या शासन निर्णयान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांनी वरील मंजुरीप्रमाणे रक्कम खर्च करताना ज्या कारणासाठी तरतूद उपलब्ध करुन दिलेली आहे, त्याच कारणासाठी पूर्णपणे खर्च करावी. याकरिता ते पूर्णपणे जबाबदार राहतील. तसेच सदरहू रक्कम प्रत्यक्ष खर्च केल्याची पूर्ण माहिती त्यांनी ३१ मार्च, २००५ पूर्वी शासनास अवगत करावी.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या रकमेचा अधिदान व लेखा कार्यालयातील लेख्याशी खर्चमेळ करुन महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम, १९९६ च्या कलम ८८ नुसार ताळेबंद तयार करुन, कलम ८९ नुसार पुढील कार्यवाहीसाठी शासनाकडे अहवाल सादर करावा.

७. हा आदेश नियोजन विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.४१९९/अ.मु.स.नि.वि./नियोजन विभाग/क १४५४, दि.१७.५.२००४ व वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.३५२/अर्थोपाय, दि.३.९.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शा. र. नागवेकर )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
प्रधान सचिव (परिवहन / बंदरे), गृह विभाग
प्रधान सचिव, वित्त विभाग
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई (५ जादा प्रतींसह)
मुख्य बंदर अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
सागरी अभियंता, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
सागरी अभियंता, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ (व्यय-८ / अर्थ-११)
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती.